उपराजधानी नागपूर शहराच्या विकासासाठी
विशेष अनुदान मंजूर करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- मनपा-२०१८/प्र.क्र.१५४/नवि-१६**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २९ ऑक्टोबर, २०१८

**संदर्भ :**- शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २२ ऑक्टोबर, २०१८

**प्रस्तावना:-**

नागपूर ही महाराष्ट्राची उपराजधानी असल्यामुळे नागपूर शहराच्या उपराजधानी संदर्भातील विकासाचा खर्च भागविण्याकरीता १९९५-९६ पासून ५ वर्षासाठी नगर विकास या उपक्षेत्रासाठी मंजूर नियतव्ययामधून प्रत्येक वर्षी रुपये १५ कोटी याप्रमाणे विशेष अनुदान नागपूर महानगरपालिकेस मंजूर करण्यात आले होते. त्याच धर्तीवर नागपूर शहराच्या विकासासाठी २०१८-१९ मध्ये विशेष अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

समक्रमांकाचा दिनांक २२ ऑक्टोबर, २०१८ चा शासन निर्णय **अधिक्रमित करून**, नागपूर हे उपराजधानीचे शहर असल्यामुळे त्या शहराच्या सर्वांगीण विकासासाठी १९९५ च्या धर्तीवर २०१८-१९ करीता रुपये १५० कोटी इतके विशेष सहाय्य अनुदान मंजूर करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. नागपूर ही उपराजधानी असल्यामुळे, त्या अनुषंगाने त्या शहराच्या विशिष्ट गरजा भागविण्यासाठी त्या अनुषंगाने या विशेष सहाय्य अनुदानातून विशिष्ट कार्यक्रमांची आखणी करण्याचा, विविध कामांचा प्राथम्यक्रम ठरविण्याचा व त्याची अंमलबजावणी करण्याचा संपूर्ण अधिकार नागपूर महानगरपालिकेस राहील.

३. या निधीतून नागपूर महानगरपालिकेने त्यांच्या प्राथम्यक्रमानुसार कामांची, खर्चाची उद्दिष्टे निवडावीत व त्यानुसार महानगरपालिकेच्या स्थायी समितीच्या मान्यतेने कामे हाती घ्यावीत. या निधीचा सुयोग्य कारणांसाठी वापर करण्याची संपूर्ण जबाबदारी नागपूर महानगरपालिकेची राहील.

४. नागपूर महानगरपालिकेस विशेष अनुदान देण्यासाठी विशिष्ट लेखाशीर्ष उपलब्ध नाही. त्यामुळे यासाठी स्वतंत्र लेखाशीर्ष उघडून नगर विकास विभागाच्या मंजूर नियतव्ययातून नागपूर महानगरपालिकेस निधी वितरीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०२९१७११५४२७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang
Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2018.10.29 18:01:22 +05'30'

**(पां. जो. जाधव)**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, नागपूर
९. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
१०. जिल्हाधिकारी, नागपूर
११. जिल्हा प्रशासन अधिकारी, नागपूर.
१२. निवडनस्ती, नवि-१६.